**प्रधानमंत्री उच्चतर शिक्षा अभियान (PM-USHA) योजनेच्या घटक क्र. ५ Gender inclusion and Equity Initiatives अंतर्गत शासकीय तंत्रनिकेतन, वाशिम या महाविद्यालयात मुलींच्या वसतीगृहाचे बांधकाम या कामासाठी येणाऱ्या रु.९,९९,९९,६२२/- इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## उच्च व तंत्र शिक्षण विभाग,

## शासन निर्णय क्र. रूसायो-२०२५/ई-९८८४७७/विशि-३

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक: ३० एप्रिल, २०२५

**संदर्भ:** १. राज्य प्रकल्प सहसंचालक, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान, यांचे पत्र क्र. जा.क्र.SPD/ RUSA २०२४-२५/ ७०३, दि. १८.१०.२०२४

२. शासन निर्णय, क्रमांक:-रूसायो-२०२४/प्र.क्र.५१/विशि-३, दि. २६.०७.२०२४

३. संचालक, वीरमाता जिजाबाई तंत्रज्ञान संस्था, यांचे पत्र क्र. VJTI/ PMUSHA/ २०२४/ २९८७, दि. २१.०८.२०२४

**प्रस्तावना:**

केंद्र शासनाने रुसा ३.० हा टप्पा प्रधानमंत्री उच्चत्तर शिक्षा अभियान (PM-USHA) या नावाने सुरु केला असून यामध्ये खालील घटकांचा समावेश आहे.

घटक-१ Multidisciplinary and Research University-
घटक-२ Grants to Strengthen University-
घटक-३ Grants to Strengthen Colleges-
घटक-४ New Model Degree College-
घटक-५ Gender Inclusion and Equity Initiatives-

शिक्षा मंत्रालय, भारत सरकार यांच्या प्रकल्प मंजूरी मंडळाच्या (PAB) दिनांक ८ मार्च २०२४ रोजी झालेल्या बैठकीमध्ये प्रधानमंत्री उच्चतर शिक्षा अभियान (PM-USHA) योजनेच्या घटक क्र. ५ Gender Inclusion and Equity Initiatives अंतर्गत राज्यातील ०४ आकांक्षित जिल्ह्यांच्या प्रस्तावांना मंजूरी देण्यात आली आहे. त्यानुसार वाशिम जिल्ह्याकरीता एकूण रु.९,९९,९९,९९५/- मंजूर करण्यात आले आहेत. या घटकांतर्गत मंजूर प्रकल्प अहवालाप्रमाणे शासकीय तंत्रनिकेतन, वाशिम या महाविद्यालयाने मुलींच्या वसतीगृहाच्या बांधकामाच्या कामासाठी सार्वजनिक बांधकाम विभागाने तयार केलेले अंदाजपत्रक सक्षम प्राधिकरणाच्या तांत्रिक मंजूरीसह सादर करून त्याबाबतच्या खर्चासाठी प्रशासकीय मान्यतेचा देण्याचा प्रस्ताव रुसा संचालनालयास पाठविला आहे. सदर प्रस्ताव संदर्भाधीन दि. १८.१०.२०२४ च्या पत्रान्वये रुसा संचालनालयाने शासनाला शिफारशीत केला असून सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:**

शासकीय तंत्रनिकेतन, वाशिम या महाविद्यालयाच्या मुलींच्या वसतीगृहाच्या बांधकामासाठी मुख्य अभियंता, वाशिम यांनी प्रमाणित केल्याप्रमाणे **एकूण रु.९,९९,९९,६२२/- (रूपये नऊ कोटी नव्याण्णव लक्ष नव्याण्णव हजार सहाशे बावीस फक्त**) एवढया खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर प्रशासकीय मान्यता वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दि.१७ एप्रिल, २०१५ मधील वित्तिय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग पाच मधील अ.क्र.०१, नियम क्र.१३४ यानुसार प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार देण्यात येत आहे.

३. उपरोक्त बाबींवर होणारा खर्च "मागणी क्रमांक-डब्ल्यू-२, प्रधानशीर्ष- २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३- विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०३- शासकीय महाविद्यालये व संस्था, (०७) राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान, (०७) (०१) राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियानांतर्गत अशासकीय संस्थांना सहायक अनुदान (६० टक्के केंद्र हिस्सा) (२२०२ आय २६३) व (०७) (०२) राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियानांतर्गत अशासकीय संस्थांना सहायक अनुदान (४० टक्के राज्य हिस्सा) (२२०२ आय २७२), ३१ सहायक अनुदाने " या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, वाशिम यांनी यावरील खर्च प्रशासकीय मान्यता दिलेल्या रकमेच्या मर्यादेत व महाविद्यालयाच्या मंजूर सविस्तर प्रकल्प अहवालातील घटक निहाय निधीच्या मर्यादेत राहील याची दक्षता घ्यावी. तसेच कामाचे उपयोगिता प्रमाणपत्र संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्यामार्फत शासनास सादर करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४३०१८३८५८३४०८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATAP PANDURANG LUBAL

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=b0d6763338fc6cc4f7cf07ca60db7abc1cfac99c84ab1b5bfc0dae4609d631d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF6895C47A84066432F5BDD1F182B4163D880AC9BD8D24A198FD0E7310BBEB59, cn=PRATAP PANDURANG LUBAL
Date: 2025.04.30 18:40:26 +05'30'

**(प्रताप पां.लुबाळ)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति :

१) मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.

४) राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान,महाराष्ट्र राज्य, मुंबई,

५) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,

६) महालेखापाल, (लेखा परीक्षण), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर,
७) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
८) संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई,
९) उपसचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण सचिव, मंत्रालय, मुंबई,
१०) विभागीय सहसंचालक, तंत्र शिक्षण, अमरावती,
११) प्राचार्य, शासकीय तंत्र निकेतन, वाशिम,
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, वाशिम,
१३) कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प कक्ष), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४) निवड नस्ती (विशि-३).